राज्याच्या जलधी क्षेत्रात एलईडी दिव्यांच्या सहाय्याने मासेमारी करणाऱ्या नौकांवर करावयाच्या कारवाईबाबत....

# महाराष्ट्र शासन

कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः मत्स्यवि -१११८/प्र.क्र. ७२/पदुम-१४,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१९

वाचा :- १) केंद्र शासनाचे आदेश क्र. २१००१/३/२०१४-Fy(Ind), दि. १०.११.२०१७
२) राज्य शासनाची अधिसुचना क्र. मत्स्यवि-१११८/प्र.क्र. ७२/पदुम १४, दि. २७.०४.२०१८
३) जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी, रायगड-अलिबाग यांचे पत्र क्र. सीपीएसआर /पी/ स्वीस/कायदा व सुव्यवस्था/रायगड/२०१९, दि. १५.११.२०१९

प्रस्तावना :-

केंद्र शासनाने वाचा - १ येथील आदेशान्वये राज्याच्या सागरी जलधी क्षेत्राबाहेरील भारतीय विशाल आर्थिक क्षेत्रात ट्रॉलिंग, पर्ससीन आणि अथवा जाळी यांचा वापर करणाऱ्या यांत्रिक तसेच यंत्रचलित मासेमारी नौकांवर जनरेटर अथवा जनरेटरशिवाय चालणारी विनाशकारी मासेमारी पद्धती, ज्यात बुल व पेअरट्रॉलिंगचा समावेश आहे, तसेच पाण्याखाली /बुडीत अथवा पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगते कृत्रिम दिवे/एलईडी लाईट, माशांना आकर्षित करणारे दिवे किंवा कोणतीही इतर प्रकाश उत्सर्जित करणारी कृत्रिम साधने/उपकरणे बसवणे अथवा त्याच्या कार्यान्वयास प्रतिबंध करण्यात आला आहे.

केंद्र शासनाच्या सदर आदेशाच्या अनुषंगाने राज्य शासनाने वाचा २ अन्वये महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम, १९८१ च्या कलम ४ च्या पोट कलम (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन व कलम ४ मधील पोट कलम (२) च्या खंड (अ), (ब) आणि (क) मधील बाबी लक्षात घेऊन तसेच या कायद्याच्या कलम ३ नुसार गठित करण्यात आलेल्या सल्लागार समित्यांशी विचारविनिमय करुन महाराष्ट्र राज्याच्या सागरी जलधी क्षेत्रात (१२ सागरी मैल) पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगते कृत्रिम दिवे/एलईडी लाईट, माशांना आकर्षित करणारे दिवे किंवा कोणतीही इतर प्रकाश उत्सर्जित करणारी कृत्रिम साधने/उपकरणे यांचा वापर करुन मासेमारी करणाऱ्या नौकांवर प्रतिबंध करण्यात आलेला आहे.

तथापि, अद्यापि तरंगते कृत्रिम दिवे/एलईडी लाईट, माशांना आकर्षित करणारे दिवे किंवा कोणतीही इतर प्रकाश उत्सर्जित करणारी कृत्रिम साधने/उपकरणे यांचा वापर करुन मोठ्या प्रमाणावर मासेमारी चालू असल्याचे आढळून आले आहे. यास्तव स्थानिक मच्छिमार व एलईडी लाईटद्वारे मासेमारी करणाऱ्या मच्छिमारांमध्ये संघर्ष होत असुन, त्यामुळे कायदा व सुव्यवस्थेचा गंभीर प्रश्न निर्माण होत असल्याचे जिल्हाधिकारी व जिल्हादंडाधिकारी, रायगड-अलिबाग यांनी वाचा - ३ येथील पत्रान्वये निदर्शनास आणलेले आहे.

**शासन परिपत्रक -**

एलईडीद्वारे मासेमारी करणाऱ्या नौकांबाबत कठोर कारवाई करण्यासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) मत्स्यव्यवसाय विभागाच्या अधिनस्त असणाऱ्या जिल्हा कार्यालयातील सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी, मत्स्यव्यवसाय प्रशिक्षण अधिकारी व सहाय्यक मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी यांनी या अधिसुचनेमध्ये प्रतिबंध केलेली सामुग्री धारण करणारी मासेमारी नौका त्यांच्या कार्यक्षेत्रातील मासेमारी बंदर/मासळी उतरविण्याचे केंद्र/खाडी क्षेत्रातून समुद्रात जाण्यास सक्त प्रतिबंध करण्यात यावा.

२) तथापि, राज्याच्या जलधी क्षेत्रात (१२ नॉटीकल मैल) अशा प्रकारे एलईडी लाईटद्वारे मासेमारी करताना आढ़ळून आल्यास अनुज्ञापन अधिकाऱ्याने या अधिसुचनेच्या तरतुदीचे उल्लंघन करणाऱ्या नौकेचा, महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम, १९८१ च्या कलम ६ अन्वये देण्यात आलेला मासेमारी परवाना, कलम ८ (१) ब नुसार रद्द करण्याबाबत कारवाई करण्यात यावी व कलम ९ अन्वये देण्यात आलेले नोंदणी प्रमाणपत्र, कलम ९ (४) नुसार यथास्थितीत निलंबित अथवा रद्द करण्याची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

३) अंमलबजावणी अधिकारी यांनी राज्य शासनाच्या दि. २७.०४.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या अधिसुचनेमधील तरतुदीचे उल्लघंन करुन राज्याच्या जलधी क्षेत्रात मासेमारी करणाऱ्या नौकांना, महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम, १९८१ च्या कलम १५ (१) अन्वये अवरुद्ध करुन सदर अधिसुचनेच्या तरतुदींचे उल्लंघन केल्याचे ठळकपणे नमूद करावे व संबंधित अभिनिर्णय अधिकारी यांचेकडे तात्काळ प्रतिवृत्त सादर करावे.

४) प्रतिवृत्तामध्ये, महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम, १९८१ च्या कायद्याच्या कलम १७ पोट कलम (१) अन्वये जास्तीत जास्त शास्ती होण्यासाठी संबंधित अभिनिर्णय अधिकारी यांचेकडे सक्षम पाठपुरावा करण्यात यावा.

५) कलम १७ (३) (अ) नुसार **गलबताचे नोंदणी प्रमाणपत्र व मासेमारी परवाना रद्द** करण्याबाबत किंवा परत घेण्याबाबत संबंधित अभिनिर्णय अधिकारी यांच्याकडे प्रतिवृत्ताद्वारे सक्षम पाठपुरावा करण्यात यावा.

६) अंमलबजावणी अधिकाऱ्यांच्या आदेशान्वये अवरुद्ध करण्यात आलेले मासेमारी गलबत हे गलबताच्या मालकाने वाचा - २ येथील शासन अधिसुचनांमधील तरतुदींचे उल्लंघन होणार नाहीत याची योग्य ती खबरदारी घेतली नसल्याचे अभिनिर्णय अधिकाऱ्यांसमोर **सक्षम व ठोस पुराव्यासह मांडण्यात यावे**; तसेच कलम १७ (३) ब मधील परिच्छेद २ नुसार अवैध एलईडीच्या सहाय्याने मासेमारी करणारे गलबत व **त्यास सहाय्य करणारे गलबत हे शासनाकडे जप्त (forfeit) करण्यासाठी सक्षमपणे मांडणी करण्यात यावी**.

७) उपरोक्त सुचनांची सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. अंमलबजावणी करण्यात कसुर करणाऱ्या संबंधित जबाबदार अधिकाऱ्यांविरुद्ध आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी शिस्तभंग विषयक कारवाई करावी.

२. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११८१६५९५८४६०१ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2019.11.18 17:02:41 +05'30'

**( अनूप कुमार )**
**प्रधान सचिव, पदुम**

**प्रत,**

१. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. जिल्हाधिकारी पालघर/ठाणे/मुंबई शहर/मुंबई उपनगर/रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग.
३. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
४. सर्व अभिनिर्णय अधिकारी तथा निवासी जिल्हाधिकारी/ तहसीलदार.
५. सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई शहर/ मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदूर्ग
६. उपसंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुबई ४०० ०३२
७. निवड नस्ती, पदुम-१४

**प्रत माहितीकरिता :-**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहाय्यक
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
५. निवड नस्ती, पदुम-१४